**सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (सर्वसाधारण) या योजनेअंतर्गत कार्यालयीन खर्च, जाहिरात व प्रसिध्दी आणि शिष्यवृत्ती/ विद्यावेतन या प्रयोजनार्थ निधी वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. मुरोनि-२०२३/प्र.क्र.०२/उद्योग-७**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४/०३/२०२३

<u>संदर्भ</u>:- १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. योजना-२०१९/ प्र.क्र. १२१/ उद्योग-७, दिनांक ०१/०८/२०१९.

२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१९/ प्र.क्र. १७७/ उद्योग-७, दिनांक ३१/०८/२०१९.

३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. योजना-२०१९/ प्र.क्र. २३०/ उद्योग-७, दिनांक २३/०१/२०२०.

४) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/ मुंरोनिका/ सर्वसाधारण/ लेखाशिर्ष निधी वितरण/ २०२२/ अे-२५८, दिनांक १५/०२/२०२३ तसेच दिनांक ०६/०३/२०२३, २०/०३/२०२३ व २१/०३/२०२३ रोजी प्राप्त माहिती.

<u>प्रस्तावना</u>:-

राज्यातील शहरी व ग्रामीण क्षेत्रातील सुशिक्षित युवक-युवतींची वाढती संख्या व उद्योग, व्यवसाय क्षेत्रात राज्यात विविध क्षेत्रात स्वयंरोजगार व रोजगाराच्या नवीन संधी उपलब्ध होत आहेत. या स्वयंरोजगार व रोजगाराच्या नवीन संधी विचारात घेऊन उद्योजकतेला चालना देणारी व सर्जनशिलतेला कालानुरुप वाव देणारी -मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम॰ (CMEGP) ही सर्वसमावेशक योजना दिनांक ०१/०८/२०१९ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आलेली आहे. त्यानुसार राज्यातील शहरी व ग्रामीण युवक-युवतींना स्वयंरोजगाराच्या विविध संधी उपलब्ध होण्यासाठी व योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय संनियंत्रण समित्या गठीत करण्यात आलेल्या आहेत.

२. सदर योजनेअंतर्गत राज्यातील युवक-युवतींना स्वयंपूर्ण/ आत्मनिर्भर बनविण्याकरीता त्यांना स्वयंरोजगार प्रकल्प स्थापित करण्यासाठी राज्य शासनाकडून आर्थिक सहाय्य हे अनुदान स्वरुपात राज्य शासनाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून उपलब्ध करुन देण्यात येईल, असे राज्याच्या औद्योगिक धोरण- २०१९ मध्ये नमूद केले आहे. त्यानुसार सदर योजनेअंतर्गत सर्वसाधारण प्रवर्ग व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी दिनांक २३/०१/२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये नवीन लेखाशिर्ष उघडण्यात आले आहे. तसेच अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडून उद्दीष्टांच्या प्रमाणानुसार तरतूद उपलब्ध करुन देण्यात येते.

३. सदर योजनेची अंमलबजावणी उद्योग विभागाच्या अधिपत्याखालील उद्योग संचालनालयाच्या अंतर्गत कार्यरत जिल्हा उद्योग केंद्र तसेच खादी व ग्रामोद्योग मंडळ यांचेअंतर्गत कार्यरत जिल्हा खादी व ग्रामोद्योग कार्यालय यांच्यामार्फत पूर्णत: ऑनलाईन पद्धतीने करण्यात येत आहे.

४. CMEGP योजनेच्या दिनांक ०१/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयातील मुद्दा क्र. ३.२.२ नुसार उद्योग संचालनालयाच्या सनियंत्रणाखाली MCED च्या सहयोगातून स्थापित विशेष आयटी व समन्वय कक्षाचे (CMEGP Cell) मे. सिट्टा टेक्नॉलॉजीज प्रा.लि. यांचेमार्फत सादर करण्यात आलेल्या खर्चाच्या देयकाची एकूण रक्कम रुपये ५४,०६,८६४/-, सदर कक्षाच्या प्रशासकीय कामांवर उद्योग संचालनालय, मुंबई व मुख्यालय, औरंगाबाद याठिकाणी झालेला एकूण खर्च रुपये २०,२७,११९/-, सदर कक्षाकरीता स्टेशनरी व इतर बाबीवर झालेला एकूण खर्च रुपये १,२७,८०४/-, सदर योजनेअंतर्गत महाबळेश्वर येथे

दिनांक २३ ते २५ एप्रिल, २०२२ या कालावधीत संपन्न झालेल्या कार्यशाळेकरीता झालेला खर्च रुपये ८,१२,४६४/- तसेच सदर योजनेची अंमलबजावणी संस्था म्हणून जिल्हा उद्योग केंद्र आणि खादी व ग्रामोद्योग मंडळ यांच्या कार्यालयीन खर्चासाठी रुपये ४,६०,००,०००/- असा एकूण ५,४३,७४,२५१/- इतका निधी सदर योजनेअंतर्गत १३- कार्यालयीन खर्च या उद्दीष्टाखालील अर्थसंकल्पित तरतूदीतून उपलब्ध करुन देणेबाबत उद्योग संचालनालयाकडून प्रस्तावित केले आहे.

५. CMEGP योजनेअंतर्गत उद्दीष्टपूर्ती व प्रभावी अंमलबजावणी होण्याकरीता योजनेची व्यापक प्रमाणावर प्रचार व प्रसिध्द होण्यासाठी दिनांक ०१/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयातील मुद्दा क्र. ३.२.२ नुसार सदर योजनेचा जिल्हा/ विभाग स्तरावर प्रचार व प्रसिध्दी करण्याच्या कामाची जबाबदारी महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्राला (MCED) दिलेली आहे. त्यानुसार योजनेची माहिती महाराष्ट्रातील कानाकोप-यात पोहचविण्यासाठी MCED मार्फत प्रकाशित करण्यात येत असलेल्या -उद्योजक॰ मासिकात दरमहा देण्यात येते. त्याकरीता आवश्यक रुपये ८,४०,०००/- इतका निधी सदर योजनेअंतर्गत २६ - जाहिरात व प्रसिध्दी या उद्दीष्टाखालील अर्थसंकल्पित तरतूदीतून उपलब्ध करुन देणेबाबत उद्योग संचालनालयाकडून प्रस्तावित केले आहे.

६. CMEGP योजनेअंतर्गत लाभार्थ्यांच्या प्रशिक्षणाकरीता योजना सुरु झाल्यापासून MCED व MITCON या दोन्ही प्रशिक्षण संस्थांना ऑनलाईन/ ऑफलाईन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याकरीता मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार सदर संस्थांमार्फत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात ऑनलाईन प्रशिक्षण दिलेले परंतु प्रशिक्षण खर्च अदा करण्यासाठी प्रलंबित तसेच सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात ऑनलाईन/ ऑफलाईन प्रशिक्षणावर झालेल्या खर्चाकरीता रुपये ४,८१,४५,८००/- एवढा निधी सदर योजनेअंतर्गत ३४ - शिष्यवृत्ती/ विद्यावेतन या उद्दीष्टाखालील अर्थसंकल्पित तरतूदीतून उपलब्ध करुन देणेबाबत उद्योग संचालनालयाकडून प्रस्तावित केले आहे.

७. अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या संदर्भ क्र. ४ येथे नमूद प्रस्तावानुसार, सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (सर्वसाधारण प्रवर्ग) या योजनेअंतर्गत १३ - कार्यालयीन खर्च, २६ - जाहिरात व प्रसिध्दी व ३४ - शिष्यवृत्ती/ विद्यावेतन या उद्दीष्टाखाली मंजूर अर्थसंकल्पित तरतूदीतून अनुक्रमे रुपये ५,४३,७४,२५१/-, रुपये ८,४०,०००/- व रुपये ४,८१,४५,८००/- इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम योजनेची सुलभ अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने सर्व प्रक्रिया ऑनलाईन पद्धतीने करण्यात आली असून उद्योग संचालनालयाच्या सनियंत्रणाखाली महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्राच्या (MCED) सहयोगातून स्थापित विशेष आयटी व समन्वय कक्षाकरीता तसेच त्याअनुषंगिक इतर बाबींकरीता आवश्यक रुपये ५,४३,७४,२५१/- (रुपये पाच कोटी त्रेचाळीस लक्ष चौ-याहत्तर हजार दोनशे एक्कावण फक्त) एवढी रक्कम, सदर योजनेची उद्दीष्टपूर्ती व प्रभावी अंमलबजावणीच्या अनुषंगाने योजनेची माहिती महाराष्ट्रातील कानाकोप-यात पोहचविण्यासाठी महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्राकडून प्रकाशित -उद्योजक॰ मासिकात जुलै, २०२२ ते फेब्रुवारी, २०२३ या कालावधीत करण्यात आलेल्या प्रचार व प्रसिध्दीकरीता आवश्यक रुपये ८,४०,०००/- (रुपये आठ लक्ष चाळीस हजार फक्त) एवढी रक्कम तसेच सदर योजनेअंतर्गत सन २०२१-२२ व सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात MCED व MITCON या प्रशिक्षण संस्थांमार्फत राबविण्यात आलेल्या ऑनलाईन/ ऑफलाईन प्रशिक्षण कार्यक्रम खर्चाकरीता आवश्यक एकूण रुपये रुपये ४,८१,४५,८००/- (रुपये चार कोटी एक्याऐंशी लक्ष पंच्चेचाळीस हजार आठशे फक्त) एवढी रक्कम, पुढील तक्त्यातील रकाना क्र. २ व ५ येथे नमूद केल्याप्रमाणे, प्रस्तुत योजनेतील तरतूदीनुसार, वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम योजना (के-७, २८५१ ६६४५) अंतर्गत उद्दीष्ट | अर्थसंकल्पिय तरतूद सन २०२२-२३ (रुपये) | सुधारीत अंदाज सन २०२२-२३ (रुपये) | वितरीत करण्यात येणारी रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | १३ - कार्यालयीन खर्च | १०,५६,००,००० | ९,५०,४०,००० | ५,४३,७४,२५१ |
| २. | २६ - जाहिरात व प्रसिध्दी | २६,४०,००० | १८,४८,००० | ८,४०,००० |
| ३. | ३४ - शिष्यवृत्त्या/ विद्यावेतने | २६,४०,००,००० | २५,०८,००,००० | ४,८१,४५,८०० |

२. सदर रक्कम आहरण व संवितरण करावयाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात येत आहेत.

३. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. अर्थसं २०२२/ प्र.क्र.४३/ अर्थ-३, दिनांक ०४/०४/२०२२ व त्यासोबतच्या परिशिष्टातील तरतुदीनुसार तसेच त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून प्राप्त माहितीनुसार असे प्रमाणित करण्यात येते की,

a) मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रमाची राज्यामध्ये अंमलबजावणी करणेबाबत शासन निर्णय दिनांक ०१/०८/२०१९ अन्वये शासन निर्णय निर्गमित करण्यात आला असून यामध्ये अर्ज प्रक्रिया व प्रकल्प मंजूरी अंतर्गत करावयाची कार्यवाही, योजनेची अंमलबजावणी यंत्रणा, अनुदान वितरण व विविध मंजूरीस्तव समिती यांची माहिती दिलेली आहे.

b) यापूर्वी सदर योजनेअंतर्गत प्राप्त झालेला निधी प्राधिकृत बँकेत जमा करण्यात येऊन सदर निधी बँकेमार्फत लाभार्थ्यांच्या खात्यात जमा करण्यात येत आहे.

c) यापूर्वी वितरीत केलेल्या ७५ टक्केपेक्षा अधिक निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झालेले आहे.

d) वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक/ महालेखापाल यांच्याकडून कोणतेही आक्षेप नाहीत.

e) सदर निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे.

४. सदर योजनेसाठी होणारा खर्च सर्वसाधारण घटकासाठी मागणी क्र. के-७, २८५१- ग्रामोद्योग व लघु उद्योग, १०२ लघु उद्योग, (००) (२५) मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (CMEGP) (२८५१ ६६४५), १३ - कार्यालयीन खर्च, २६ - जाहिरात व प्रसिध्दी व ३४ - शिष्यवृत्ती/ विद्यावेतन या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात सुधारीत अंदाजाद्वारे मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/ प्र.क्र.४३/ अर्थ-३, दिनांक ०४/०४/२०२२ मधील परिच्छेद ३ व त्यासोबतच्या परिशिष्टामधील अटींची पूर्तता होत असल्याने तसेच वित्त विभागाच्या दिनांक १६/०३/२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०३२४११२७४५८२१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJEEV VITTHAL RAJMANE

Digitally signed by RAJEEV VITTHAL RAJMANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=236eb645736d99439ecdba7a9ca089f1295797136f40d4172ad8740745981e39, pseudonym=5986A7EF7C4A5144BE154D090DDF15619B0872E6, serialNumber=9AF1A1281C6D8847D249FEF2488B7CAA84A3751E6EE91EBAA5CC0332D8B30060, cn=RAJEEV VITTHAL RAJMANE
Date: 2023.04.05 17:05:23 +05'30'

**(राजीव राजमाने)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई - ३२. (शाईच्या मूळ ५ प्रती)

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई -९३.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई -०१.
४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघू उद्योग विकास महामंडळ, मुंबई-३८.
५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
८) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
९) सर्व विभागीय उद्योग सह संचालक (उद्योग संचालनालयामार्फत).
१०) सर्व महाव्यवस्थापक जिल्हा उद्योग केंद्र (उद्योग संचालनालयामार्फत).
११) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१६), मंत्रालय, मुंबई -३२.
१२) नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई § ३२.
१३) अवर सचिव (कार्यासन प्रशासन- १), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१४) निवडनस्ती (उद्योग-७).